**मुदतवाढ**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवरील विशेष पोलीस महानिरीक्षक ,नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य,मुंबई. या पदास मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**गृह विभाग,**
शासन निर्णय, क्रमांक - आयपीएस-१२११/ प्र.क्र.३३२ /पोल-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, **दिनांक : १७ सप्टेंबर, २०११.**

**वाचा:-** १) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-आयपीएस-१२०५/प्र.क्र.६०१/पोल-१, दिनांक ०३.०१.२००६.
२) शासन निर्णय,गृह विभाग, क्रमांक- आयपीएस- १२०६/प्र.क्र.३३२/पोल-१, दि. १६.०९.२०११
३) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्रमांकपोमसं/२६-ब/६१४३/अपोमसं/(नाहसं)/१३/०६, दिनांक ९.०८.२०११.

**शासन निर्णय** : पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवरील विशेष पोलीस महानिरीक्षक, नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई या पदाच्या कामाचा व्याप वाढलेला असल्यामुळे, दिनांक ०३ जानेवारी, २००६ च्या शासन निर्णयान्वये या पदाची अपर पोलीस महासंचालक, नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई दर्जाच्या पदामध्ये प्रथमत: दिनांक ३१.०२.२००६ पर्यंत श्रेणीवाढ करण्यास मान्यता देण्यात आली.या नंतर सदर पदाची पुन्हा दि.५/१०/२०१० अन्वये, विशेष पोलीस महानिरीक्षक . नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई,अशी श्रेणी अवनत करण्यात आली.या अस्थायी पदास संदर्भ क्रमांक २ येथील निर्णयान्वये दिनांक ३०.०६.२०११ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. या अस्थायी पदास पुढील मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव पोलीस महासंचालकांनी संदर्भ क्रमांक ३ अन्वये शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

२. वित्त विभागाने, पदांच्या आढाव्यांची कार्यवाही पूर्ण करुन संयुक्त सचिव समितीसमोर प्रस्ताव सादर करण्याच्या अटीचे अधीन राहून व गृह विभागांतर्गत अस्तित्वात असलेल्या पदांना हे पद ६ महिण्यापेक्षा जास्त दिवस रिक्त नाही या अटीच्या अधिन राहून गृह विभागाच्या नियंत्रणाखालील विविध अस्थायी पदांना दिनांक ०१.०७.२०११ ते ३१.१२.२०११ पर्यंत मुदतवाढ देण्यास मान्यता दिलेली आहे.

३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवरील विशेष पोलीस महानिरीक्षक ,नागरी मुंबई,हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य,मुंबई, हे पद पद सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नव्हते. सदर वस्तुस्थिती विचारात घेता, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवरील विशेष पोलीस महानिरीक्षक , नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई,या अस्थायी पदास दिनांक ०१.०७.२०११ पासून दिनांक ३१.१२.२०११ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय,अनुक्रमे वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४१८/११/व्यय-७, दिनांक १६.०७.२०११ अन्वये त्या विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. यासाठी होणारा खर्च, "२०५५-पोलीस-००१-संचालन व प्रशासन - पोलीस निरीक्षणालये" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो या लेखाशिर्षाखालील सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०९१९१०२३२१००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( कैलास वि. बिलोणीकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.**

प्रति,

- महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
- अपर पोलीस महासंचालक (नागरी हक्क संरक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
- विशेष पोलीस महानिरीक्षक ,नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
- महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा) महाराष्ट्र, मुंबई,
- अधिदान व लेखा अधिकारी /निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
- गृह विभाग, कार्यासन (बीयुडी-१ / पोल-३ / विशा-६), मंत्रालय, मुंबई,
- वित्त विभाग, व्यय-७ / वित्तीय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई.
- संगणक समन्वयक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
- निवड नस्ती (पोल-१)